**नायब तहसीलदार “गट-ब” संवर्गातील श्रीमती सोनाली वाघ, नायब तहसिलदार या परिविक्षाधीन उमेदवारांकरीता १ अधिसंख्य पद निर्माण करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- ईएसटी-२०१८/प्र.क्र.१२७/ई-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ११/०२/२०१९.

<u>संदर्भ</u>:- १) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र ईएसटी-२०१५/प्र.क्र.५५/ई-८, दि.२१/८/२०१५.
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. ईएसटी-२०१५/प्र.क्र.५५/ ई-८, दि.२६/०५/२०१७.
३) विभागीय आयुक्त, नागपूर यांचे पत्र क्र. कार्या-२०/लेशा/ले-६/प्र.वे./कावी-९९/२०१८, दि.२८/०३/२०१८

**<u>प्रस्तावना:-</u>**

महसूल व वन विभागाच्या दिनांक २१/०८/२०१५ व दिनांक २६/०५/२०१७ च्या शासन निर्णयान्वये सीपीटीपी-२ अंतर्गत दिनांक ०२/०५/२०१५ ते दिनांक ३१/०५/२०१७ या कालावधीतील दोन वर्षाच्या प्रशिक्षणासाठी महसुल व वन विभागाने नायब तहसिलदार गट ब संवर्गातील १३१ अधिसंख्य पदे निर्माण केली होती. महसूल व वन विभागाच्या दिनांक ०९/१०/२०१५ व दिनांक १६/१०/२०१५ च्या आदेशान्वये श्रीमती वाघ यांना ६६ आठवडयांच्या प्रशिक्षणासाठी पुणे विभाग व पुणे जिल्हा वाटप करण्यात आला होता. त्यानंतर महसूल व वन विभागाच्या दि. २२/५/२०१७ च्या शासन आदेशान्वये श्रीमती वाघ यांना नागपूर महसूली विभाग वाटप केला होता. सदर प्रशिक्षण कालावधीत श्रीमती सोनाली वाघ, परिविक्षाधीन नायब तहसिलदार या दि.१५/७/२०१६ ते दि.१०/१/२०१७ या कालावधीत प्रसुती रजेवर होत्या. या कारणास्तव श्रीमती वाघ यांचे ६६ आठवडयाचे प्रशिक्षण पुर्ण झाले नसल्याने विभागीय आयुक्त पुणे यांनी दि.३१/०५/२०१७ रोजी कार्यमुक्त केले नाही. त्यानंतर श्रीमती वाघ यांना दि. १६/१०/२०१७ रोजी विभागीय आयुक्त, पुणे यांनी नागपूर महसूली विभागात हजर होण्यासाठी कार्यमुक्त केले आहे. श्रीमती वाघ यांना वेळेवर कार्यमुक्त न केल्याने व जिल्हाधिकारी, पुणे यांच्या आस्थापनेवर अधिसंख्य पद मंजूर नसल्याने श्रीमती वाघ यांना दि.०१/०६/२०१७ ते दि. १६/१०/२०१७ या कालावधीचे वेतन व भत्ते अदा करण्यात आले नाही. त्यामुळे जिल्हाधिकारी, पुणे यांच्या आस्थापनेवर दि. ०१/०६/२०१७ ते दि. १६/१०/२०१७ या कालावधीकरिता परिविक्षाधीन नायब तहसिलदार या एका अधिसंख्य पदास मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णयः-**

राज्य सेवा मुख्य परीक्षा-२०१६ अंतर्गत महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या व सामान्य प्रशासन विभागाने प्रशिक्षणांतर्गत कार्यक्रमासाठी नियुक्त केलेल्या जिल्हाधिकारी, पुणे या कार्यालयाच्या आस्थापनेवर १ परिविक्षाधीन नायब तहसिलदारांसाठी “गट-ब” संवर्गातील रु.९३००-३४८०० (ग्रेड पे रु. ४३००/-) या वेतनश्रेणीतील एका अधिसंख्य पदास **दि.०१/०६/२०१७ ते दि.१६/१०/२०१७** या कालावधीकरीता मुदतवाढ देण्यास शासन मान्यता देत आहे.

सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग विभागाच्या सहमतीने व वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र. ५२१ आपुक दिनांक १/१२/२०१८ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१९०२१११५३०२३६६१९ असा आहे. उक्त शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Digitally signed by Ajit Sopanrao Deshmukh
Date: 2019.02.11 15:34:30 +05'30'

**( अजित देशमुख )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे / नागपूर विभाग, नागपूर.
२) जिल्हाधिकारी, पुणे .
३) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
४) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
५) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा), महाराष्ट्र § १/२, मुंबई/नागपूर
६) उप सचिव (आपुक) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
७) अवर सचिव ( कार्यासन-सीपीटीपी-ब) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
८) उप सचिव (कार्यासन ब-१/ई-९) महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई - ३२.
९) निवड नस्ती, कार्यासन ई-८, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.